शिक्षणखात्याचा मंजुरी -क्रमांकः पापुम २२७०/१७२९२-स (पुस्तके) दिनांक १०-२-१९७६

# बालभारती

## मराठी, पुस्तक पहिले




१९८४

**महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ**

**पुणे**

# अनुक्रमणिका



# १. घर

बघ बघ.
घर बघ.
आई, घर बघ.

बघ घर आई

ब घ र आ ई



## २. जगन

घर बघ.
जगन, घर बघ.

**जगन**

ज ग न



३. शरद

शरद, घर बघ.
शरद, नळ बघ.

| शरद | नळ |
|---|---|

| श | र | द | न | ळ |
|---|---|---|---|---|



## ४. कमल

कमल, घर बघ.
कमल, नळ बघ.

कमल

क म ल



## ५. अभय

अभय, घर बघ.
अभय, नळ बघ.

**अभय**

अ भ य



## ६. अंगण

जगन, अंगण बघ.
शरद, अंगण बघ.
कमल, अंगण बघ.

**अंगण**

अं ग ण



## ७. आत चल

कमल, आत चल.
जगन, आत चल.
शरद, आत चल.
अभय, आत चल.

आत चल

आ त च ल



## ८. चटई आण

शरद, चटई आण.
चटकन आण.
चटई अंथर.
चटकन अंथर.
कमल बस.
जगन बस.

चटई चटकन अंथर बस

च ट ई अं थ र ब स



## १. छत बघ

कमल, छत बघ.
जगन, छत बघ.
अभय, छत बघ.
शरद, छत बघ.

छत

छ त

## १०. ऊसच ऊस

शरद, ऊस बघ.
अबब! ऊसच ऊस.
जगन, ऊस आण.
कमल, रस आण.
रस ओत.
कप भर.



ऊस कप ओत

ऊ स क प ओ त

## ११. झडप उघड

अभय, पटकन वर चढ.

झडप उघड.

झटकन झडप उघड.

अभय, उतर.

चटकन उतर.

झडप उघड

झ ड प उ घ ड



## १२. ढगच ढग



जगन, वर बघ.
शरद, ढग बघ.
ढगच ढग.
अबब ! ढगच ढग.
अभय, चल.
लवकर चल.
कमल, पळ पळ.
ढगच ढग.

पळ ढग लवकर

ढ ग ल व क र

## १३. ओहळ

जमन, ओहळ बघ.
अभय, ओहळ बघ.
खळखळ, खळखळ-
शरद, खळखळ ऐक.
कमल, खळखळ ऐक.
खळखळ, खळखळ.
खळखळ, खळखळ.



ओहळ ऐक खळखळ

ओ ह ळ ख ळ ख ळ

## १४. फणस

अभय, एक फणस उचल.
जगन, फणस धर.
अभय, फणस आण.
जगन, मदत कर.
कमल, मदत कर.

बबन, इतर फणस आण.



इतर फणस एक धर

फ ण स इ त र ए क

## १५. औषध आण

कमल, ऊठ.
औषध आण.
शरद, एक कप आण.
जगन, कप धर.
कमल, औषध ओत.



**औषध** **ऊठ**

औ ष ध ऊ ठ

# १६. अक्षर-ओळख

आई जगन शरद कमल अभय
घर अंगण नळ छत झडप
बघ चल अंथर बस आण
ओत उघड चढ पळ ऐक
धर ऊठ
ढग ओहळ औषध फणस चटई
वर इतर एक अक्षर खळखळ

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः
क ख ग घ ङ     च छ ज झ ञ
ट ठ ड ढ ण     त थ द ध न
प फ ब भ म     य र ल व
श ष स     ह ळ क्ष ज्ञ

## १७. पाऊस आला



वारा आला.
पाऊस आला.
गारा पडतात बघा बघा.
गारा खा. गारा खा.

पाऊस आला.
पाऊस आला.

| वारा | गारा | आला | खा |
| --- | --- | --- | --- |

| गा | वा | रा | ला |
| --- | --- | --- | --- |



## १८. चिवचिव चिवचिव



चिऊताई, चिऊताई, हवा का खाऊ ?
चिव चिव चिव.
चिऊताई, चिऊताई, हवा का शिरा ?
चिव चिव चिव.
चिऊताई, चिऊताई, हवा का वडा ?
चिव चिव चिव.

शिरा दिला चिऊताईला.
वडा दिला चिऊताईला.

शिरा मिळाला, चिव चिव चिव.
वडा मिळाला, चिव चिव चिव.

चिऊताई चिवचिव शिरा मिळाला

चि शि मि





## १९. ताजी भाजी

मी आणली भाजी.
ताजी ताजी भाजी.

छान छान काकडी.
हिरवी-हिरवी अंबाडी.

मी आणली भाजी.
ताजी ताजी भाजी.

आजी ग आजी,
कर ना ग भाजी.

| भाजी | ताजी | काकडी | मी |
|---|---|---|---|

| जी | डी | मी |
|---|---|---|





## २०. कुणाला काय ?

एक खुळखुळा सुहासला.
एक फुगा कुमुदला.
एक गुलाब शुभाला.
गुलाब लागला फुलायला.
शुभा लागली हसायला.
फुगा लागला उडायला.
कुमुद लागली बघायला.
खुळखुळा लागला वाजायला.
सुहास लागला नाचायला.

| खुळखुळा | फुगा | गुलाब | सुहास |
|---|---|---|---|

| खु | फु | कु | सु | गु |
|---|---|---|---|---|

## २१. रुसू नका



रुसूबाई, रुसू नका.
मान खाली घालू नका.
दूर पळून जाऊ नका.
मुळूमुळू रडू नका.
लाडू दूर सारू नका.
दूर दूर राहू नका.



वळून जरा बघा बघा.
आई आली बघा बघा.

रुसूबाई रुसली.
आईला बघून हसली.



| दूर | बघून | लाडू |
| --- | --- | --- |
| दू | घू | डू |

## २२. झाडे लावू या



इकडे झाडे, तिकडे झाडे,
जिकडे तिकडे झाडेच झाडे.

इकडे पाने, तिकडे पाने,
जिकडे तिकडे पानेच पाने.

इकडे फुले, तिकडे फुले,
जिकडे तिकडे फुलेच फुले.

इकडे फळे, तिकडे फळे,
जिकडे तिकडे फळेच फळे.

झाडेच झाडे लावू या.
फळेच फळे खाऊ या.

| झाडे | फळे | फुले | इकडे |
|---|---|---|---|

| डे | ले | ळे |
|---|---|---|

## २३. हैबत गैबत

हा आमचा बैल आहे.
नाव याचे हैबत आहे.

हाही आमचाच बैल आहे.
नाव याचे गैबत आहे.

हैबत गैबत वैरण खातात.
हैबत गैबत औत ओढतात.

| हैबत | गैबत | बैल | वैरण |
|---|---|---|---|
| है | गै | बै | वै |

## २४. मोर बघा मोर



मोर बघा मोर.
छान छान मोर.
बघा बघा समोर.

छान छान पिसारा.
मजेदार पिसारा.
मखमली पिसारा.

मोर बघा मोर.
छान छान मोर.

ढगाकडे पाहतात.
डोल डोल डोलतात.
गोल गोल नाचतात.

| मोर | समोर | डोल | गोल |
|---|---|---|---|

| मो | डो | गो |
|---|---|---|

## २५. चौकातला हौद



चला चला, चौकात चला.
भराभरा काम करा.
भराभरा काम करा.
सगळा चौक साफ करा.
काम करा भराभरा.
सगळा हौद साफ करा.
सारेजण काम करतात.
हौसेने काम करतात.
मौजेने काम करतात.
हौद, चौक साफ करतात.

| चौक | हौद | मौज |
| --- | --- | --- |
| चौ | हौ | मौ |

## २६. आमचे पतंग

हा माझा पतंग.
हा नंदाचा पतंग.
हा चंदाचा पतंग.

माझा पतंग तांबडा.
नंदाचा पतंग जांभळा.
चंदाचा पतंग पांढरा.

माझा पतंग उंच उडाला.
नंदाचा आणखी उंच उडाला.
चंदाचा तर उंचच उंच उडाला.

पतंग तांबडा जांभळा पांढरा

तं तां जां पां

## २७. वाचा–बोला–लिहा

१. आजोबा आजी आई बाबा काका काकी
मामा मामी मावशी बहीण भाऊ

२. कागद पतंग निळा तांबडा पिवळा
दोरा रीळ ढील उंच वारा शेपूट

३. नदी नदीकाठ वाळू पाणी हंडा घागर
चुंबळ खडक आंघोळ साबण कपडे

४. फळा खडू टेबल पिशवी डबा
बाक झाडू टोपली केर सफाई

५. बैलगाडी होडी टांगा सायकल
मोटार आगगाडी विमान

६. दुकान दुकानदार तराजू वजन
पिशवी डबे किंमत पैसे मोड

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः
ा ि ी ु ू े ै ो ौ ं ः
क का कि की कु कू के कै को कौ कं कः

# २८. दिवाळी आली

दिवाळी आली.
काका आला.
काकी आली.
मामा आला. मामी आली.
इवली इवली लता आली.
दादा आला. वहिनी आली.
आमची आता मजा झाली.



**वाचा – बोला – लिहा**

बाबा ताई माय
मामा दादा आई
फटाके बाण तुडतुडी
टिकली भुईनळा दिवाळी.

## २९. पोपट

पोपटा, पोपटा,
बोलतोस गोड,
पण झालास रोड.
खा ना जरा पेरूची फोड.

भाऊ, भाऊ,
बोलतोस गोड,
देतोस फोड,
दार उघड आणि मला सोड.

भाऊ, भाऊ,
रानात जाईन,
फळे खाईन,
डहाळीवर बसून झोके घेईन.





### वाचा - बोला - लिहा

गोड झोके देतोस पोपट
फोड रोड सोड
उघड जाईन बसून
पक्षी राघू हिरवागार
पिंजरा विठूविठू

## ३०. मनीमाऊ



मनीमाऊ, मनीमाऊ,
अंग तुझे किती मऊ !
डोळे तुझे घारे घारे.
मिशीवरून जीभ फिरे.
मखमलीचे मऊ पाय
चालून चालून थकले काय ?

पाऊल तुझे वाजेना.
चाहूल काही लागेना.
गुपचूप येऊन बसतेस कशी ?
डोळे मिटून बघतेस कशी ?
इवले इवले तुझे कान
उभे करून ऐकतेस काय ?
उंदीरमामा बिळात बाई,
आता बाहेर यायचा नाही.

वाचा - बोला - लिहा

घारे डोळे गुरगुर मऊमऊ मखमल

# ३१. फुगेवाला

आला आला फुगेवाला.
फुगेच फुगे, फुगेच फुगे.

लाल फुगे, निळे फुगे,
हिरवे फुगे, पिवळे फुगे,
नारिंगी फुगे, जांभळे फुगे,
लांबडे फुगे, गोल फुगे,
हालते फुगे, झुलते फुगे,
कितीतरी फुगेच फुगे.

मैना येईल, फुगे घेईल,
बैजू येईल, फुगे घेईल.

पैसे देऊ, फुगे घेऊ.
उंच उंच फुगे उडवू.
आनंदाने बघत राहू.



**वाचा - बोला - लिहा**

मैना बैजू पैसा कैरी पैज वैरण सैनिक
वैमानिक फेरीवाला चौक मुले घोळका ललकार

## ३२. फुलपाखरू

फुलपाखरू।
छान किती दिसते। फुलपाखरू ॥ धृ० ॥
या वेलीवर। फुलांबरोबर
गोड किती हसते। फुलपाखरू

पंख चिमुकले। निळेजांभळे
हालवुनी झुलते। फुलपाखरू

डोळे बारिक। करिती लुकलुक
गोल मणी जणु ते। फुलपाखरू

मी धरु जाता। येइ न हाता
दूरच ते उडते। फुलपाखरू



# ३३. खारूताई



सर सर झाडावर,
झर झर खाली,
घरांच्या कौलांवर,
कौलांवरून अंगणात, ही पहा खार.

खारूताई, खारूताई, थांबलात का ?
जेवायला लगेच बसलात का ?
शेंगांचा फराळ आवडला का ?

वा रे तुमची बैठक !
वा रे तुमची ऐट !

कुरूकुरू खाता.
सुरूसुरू पळता.
चकचक बोलता.
टकमक बघता.

आमच्याशी या ना, खेळायला,
धावायला नि पळायला.
तुमची आमची दोस्ती,
खूप करू मस्ती.

**दोस्ती** **मस्ती**



# ३४. गांधीजी

हे आपले गांधीजी.
किती साधे दिसतात ते!

गांधीजी पहाटे लवकर उठत.
देवाची प्रार्थना करत.
खूप खूप काम करत.
दिवसभर त्यांचे काम चालूच असे.

गांधीजी झोपडीत राहत.
ते दररोज सूत कातत.

स्वतः तयार केलेले कापड वापरत.
ते नेहमी स्वच्छ राहत. नेहमी खरे बोलत.

गांधीजींना मुले फार आवडत.
ते मुलांचे बापू होते.
ते सर्वांचेच बापू होते.

वंदन करू या गांधीजींना.
'गांधीजी की जय' बोला.



## प्रार्थना

# ३५. बाहुली

या बाई या,<br>
बघा बघा कशी माझी बसली बया!<br>
ऐकू न येते,<br>
हलूहलू अशी माझी छबी बोलते.<br>
डोळे फिरविते,<br>
टुलूटुलू कशी माझी सोनी बघते.<br>
बघा बघा ते,<br>
गुलूगुलू गालांतच कशी हसते.<br>
मला वाटते,<br>
हिला बाई सारे काही सारे कळते.<br>
सदा खेळते,<br>
कधी हट्ट धरून न मागे भलते.<br>
शहाणी कशी!<br>
साडी चोळी नवी ठेवी जशीच्या तशी.



हट्ट

# ३६. पेरूची फोड

पेरू घ्या पेरू.

ताजे ताजे पेरू. गोड गोड पेरू.

पेरू घ्या पेरू.

माधव : आई, पेरू घेतेस ? घे ना ग.

आई : हाक मार त्याला.

पैसे दे. तीन चांगले पेरू निवडून घे.

सुधा, उषा, या. माधव पेरू आण.

मी फोडी करून देते.

माधव : पेरू किती छान आहे !

सुधा : पेरू किती गोड आहे !

उषा : पण आई, तुला ग ?



आई : मला नको, तुम्हीच खा.

उषा : आई, माझ्या दोन फोडी तू घे.

सुधा : माझ्याही दोन फोडी घे.

माधव : माझ्यापण दोन फोडी घे.

आई : वा ! माझ्याजवळ तर खूप फोडी झाल्या.
ही घ्या यांतली एकेक फोड.

माधव : माझा पेरू किती गोड लागला !

सुधा : माझा तर फारच गोड होता !

उषा : पण मी सांगू ? आईची फोड फारच गोड !
पेरूची फोड लागली गोड.
आईची फोड तर फारच गोड !



घ्या माझ्या त्याला

## ३७. मी कोण ?



शेत नांगरतो, कुळव हाकतो,
पेरणी करतो, तण काढतो,
खत घालतो, पाणी देतो,
कष्ट करून धान्य देतो.

मी कोण ?



केव्हा येईल, केव्हा येईल,
सारेच माझी वाट बघतात.
नाव पत्ते वाचून मी
त्यांची पत्रे देतो हातात.

मी कोण ?



स्वच्छ रहा, ताजे खा,
सर्वांना मी सांगत असतो.
मात्र आजार झालाच तर,
औषध देऊन बरे करतो.

मी कोण ?



भोंगा वाजताच गिरणीत जातो,
विजेच्या मागावर झरझर विणतो.
ताग्यामागून तागे काढतो.
सगळ्यांना मी कापड देतो.

मी कोण ?



खाकी पोशाख, हाती बंदूक,
चाल माझी शिस्तीची.
रक्षण करतो शत्रूपासून,
शान राखतो देशाची.

मी कोण ?

कष्ट शत्रू केव्हा स्वच्छ

# ३८. माझा घोडा

टपटप टपटप टाकित टापा चाले माझा घोडा
पाठीवरती जीन मखमली पायि रुपेरी तोडा.

उंच उभारी दोन्ही कान
ऐटित वळवी अपुली मान
मधेच केव्हा दुडकत दुडकत चाले थोडा थोडा.

घोडा माझा फार हुशार
पाठीवर मी होता स्वार
नुसता त्याला पुरे इशारा, कशास चाबुक ओढा?

घोडा माझा घाली रिंगण
उखडुन टाकी सारे अंगण
काही त्याला अडवित नाही, नदी असो की ओढा.

सात अरण्ये, समुद्र सात
ओलांडित हा एक दमात
आला आला माझा घोडा, आधी रस्ता सोडा.



| दोन्ही | अरण्य | समुद्र | रस्ता |
|---|---|---|---|

## ३९. घड्याळबाबा



घड्याळबाबा भिंतीवर बसतात.
दिवसभर टिक्-टिक् करतात.
टण्-टण् ठोके देतात.
आणि सांगतात–
मुलांनो, सहा वाजले,
आता उठा.
मुलांनो, आठ वाजले,
आता आंघोळ करा.
मुलांनो, दहा वाजले,
आता जेवायला बसा.
अकरा वाजले, शाळेत जा.
आम्ही रोज घड्याळबाबांचे ऐकतो.
पण रविवारी मात्र ऐकत नाही.
ते म्हणतात–सहा वाजले, उठा.
आम्ही सात वाजता उठतो.
ते म्हणतात–आठ वाजले, आंघोळ करा.
आम्ही नऊ वाजता आंघोळ करतो.
ते म्हणतात–दहा वाजले, जेवायला बसा.
आम्ही अकरा वाजता जेवायला बसतो.

आणि रविवारी शाळेला तर
सुटीच असते.
घड्याळबाबा खूप चिडतात.
जोरजोराने टिक्-टिक् करतात.
रागारागाने ठण्-ठण् ठोके वाजवतात;
पण रविवारी आम्ही त्यांच्याकडे
पाहतच नाही.
पाहिले तर नुसते हसतो
आणि खेळत राहतो.
घड्याळबाबा रागावतात.
सोमवारची वाट पाहत बसतात.



घड्याळ मात्र

# ४०. एक रविवार असा आला



आईला कधी सुटी नसते. एकसारखी ती कामात असते.
दिवाळीची सुटी नाही. नाताळची सुटी नाही.
पण एक रविवार असा आला.
आम्ही मुलांनी विचार केला.
ताई झाली आई. तिने उठायची केली घाई.
सगळे आम्ही लवकर उठलो. सकाळपासून कामाला लागलो.
घरातली सफाई ताईने केली. अंगण आम्ही साफ केले.
सडा-रांगोळी ताईने केली. कामाला अशी सुरुवात झाली.
दादा बाजारात गेला. भाजी घेऊन आला.
ताईने मग भाजी निवडली. दादाने ती धुऊन घेतली.
कुणी डाळ-तांदूळ काढले. कुणी पीठ मळून दिले.
कामाची अशी वाटणी केली.

आईच्या थाटात ताई पोळ्या लाटू लागली.
काय झाले कळले नाही. तव्यावर थोडे बोट भाजले.
त्यावर आम्ही फुंकर घातली. बोट लगेच बरे झाले.
सगळे हात कामाला लागले.
बघता बघता स्वयंपाक झाला.
पाने वाढायला सुरुवात झाली.
मग बाबांना बोलावले. ते पाटावर येऊन बसले.
मग सगळे गेलो आईकडे.
तिने आम्हांला जवळ घेतले. काही न बोलता कुरवाळले.
मग आई उठली. येऊन पंगतीला बसली.
ताई मात्र बावरली.
कानांत आमच्या कुजबुजली —
भाजी होती कच्ची, पोळी होती करपली.
भाताची तर खीरच झाली.
तरी सगळी आनंदाने जेवली.
एक दिवस आईला सुटी मिळाली.



कच्ची | तव्यावर | पोळ्या

# ४२. गाणी

## १. पाऊस

आभाळ वाजलं  धडाड धुम
वारा सुटला  सूं सूं सुम्म

वीज चमकली  चक चक चक
जिकडे तिकडे  लख लख लख

पाऊस आला  धो धो धो
पाणी वाहयलं  सों सों सों

पाण्यात बोट  सोडली सोडली
हातभर जाऊन  बुडली बुडली

बोटीवर बसला  बेडुक बेडुक
तो ओरडला  डरांव डुक डरांव डुक



# २ केळीच्या बागा मामाच्या



केळीच्या बागा मामाच्या
पिवळ्या घडांनी वाकायच्या.
मामा आमचा प्रेमाचा
घडावर घड धाडायचा.

आक्का मोठी हौसेची
भरपूर केळी सोलायची.
आत्या मोठ्या हाताची
तिनेच साखर लोटायची.

आजी आमची मायेची
सायच साय ओतायची.
ताई नीटस कामाची
जपून शिकरण ढवळायची.

आई आग्रह करायची
पुरे पुरे तरि वाढायची.
वाटीवर वाटी संपवायची
मामाला ढेकर पोचवायची.



## ३. चिमणीचा घरटा....

"चिव चिव चिव रे। तिकडे तू कोण रे?
"कावळे दादा, कावळे दादा, माझा घरटा नेलास बाबा?"
"नाही ग बाई, चिमूताई, तुझा घरटा कोण नेई?"
"कपिला मावशी, कपिला मावशी, घरटे मोडून तू का जाशी?"
"नाही ग बाई, मोडीन कशी? मऊ गवत दिले तुशी."
"कोंबडी ताई, कोंबडी ताई, माझा घरटा पाहिलास बाई?"
"नाही ग बाई, मुळी नाही, तुझा माझा संबंध काही?"
"आता बाई पाहू कुठे? जाऊ कुठे? राहू कुठे?
गरीब बिचाऱ्या चिमणीला सगळे टपले छळण्याला."

चिमणीला मग पोपट बोले "का ग तुझे डोळे ओले?"
"काय सांगू बाबा, तुला? माझा घरटा कोणी नेला?"
"चिमूताई, चिमूताई, माझ्या पिंजऱ्यात येतेस बाई?
पिंजरा किती छान माझा! सगळा शीण जाई तुझा."

"जळो तुझा पिंजरा मेला! त्याचे नाव नको मला!
राहीन मी घरट्याविना!" चिमणी उडून गेली राना.

# आपले राष्ट्रगीत

जनगणमन-अधिनायक जय हे
भारत-भाग्य विधाता ।
पंजाब सिन्धु गुजरात मराठा
द्राविड़ उत्कल बंग
विंध्य हिमाचल यमुना गंगा
उच्छल जलधि तरंग
तव शुभ नामे जागे, तव शुभ आशिस मागे
गाहे तव जय गाथा ।
जनगण मंगलदायक जय हे भारत-भाग्यविधाता ।
जय हे, जय हे, जय हे, जय जय जय जय हे ॥

# निवेदन

१९७६–७७ या शालेय वर्षापासून इयत्ता १ ते ७ साठी 'बालभारती'ची नवीन पाठमाला क्रमशः उपलब्ध करून दिली जावी असे मंडळाने धोरण आखले. त्यानुसार तयार करण्यात आलेले इयत्ता पहिलीचे हे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

इयत्ता पहिलीचे हे पुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार होण्याच्या दृष्टीने विशेष काळजी घेण्यात आली आहे. या पुस्तकाच्या चाचणीप्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, शिक्षणसंस्था इत्यादींकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले आहेत. शिवाय महाराष्ट्रातील सर्व जिल्ह्यांतून काही निवडक शाळांमध्ये हे पुस्तक प्रत्यक्ष शिकवूनही पाहिले आहे आणि आलेल्या अनुभवांच्या व अभिप्रायांच्या संदर्भात ते अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. या कामी मंडळाला अनेकांचे सहकार्य लाभले आहे. विशेषतः या पुस्तकाची सघन चाचणी राज्य शिक्षणशास्त्र संस्थेने घेतली याबद्दल मंडळ त्या संस्थेचे आभारी आहे.

या पुस्तकाचे अंतिम लेखन-संपादन मंडळाच्या मराठी भाषा समितीने केले आहे. या कामी समितीच्या सदस्यांनी जे आस्थापूर्वक परिश्रम घेतले त्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्ययन-अध्यापन प्रभावी होण्याच्या दृष्टीने शिक्षकांसाठी एक हस्तपुस्तिका तयार करण्यात आली आहे. महाराष्ट्रातील शिक्षकमित्र या हस्तपुस्तिकेचा आस्थापूर्वक उपयोग करतील अशी अपेक्षा आहे.

पुणे :
दि. १३ एप्रिल १९७६
२४ चैत्र १८९८

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ



प्रथमावृत्ती : १९७६ आठवे पुनर्मुद्रण : १९८४
प्रकाशक : श. वा. वेलणकर, नियंत्रक, पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, मुंबई 400 018.
मुद्रक : D.G. Mirchandani IBH Printers, Marol Naka, Andheri (East) Bombay – 400 059
मुद्रणादेश : P.O.T.B./ 533 (2·00) 84–85
कागद : ६१×८६ सेमी./६० ग्रॅम चौमी., व्हाइट प्रिंटिंग पेपर
"ह्या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण खात्याने सवलतीच्या दराने उपलब्ध करून दिला आहे."

